राज्य योजनांतर्गत योजना १६-वनस्थानकांचे बांधकाम या योजने अंतर्गत सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षात अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

### शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.११४/फ-६

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० मार्च, २०१५

**वाचा :-**

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३८(१४-१५)/३७८, दिनांक ७.६.२०१४
२) शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.११४/फ-६ दिनांक २०.६.२०१४
३) शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.११४/फ-६ दिनांक १५.७.२०१४
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३ दिनांक २.१.२०१५
५) शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.११४/फ-६ दिनांक ३०.१.२०१५
६) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३,दिनांक ९.२.२०१५
७) शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.११४/फ-६ दिनांक १२.२.२०१५

**प्रस्तावना :-**

वनक्षेत्राचे संरक्षण, अवैध वृक्षतोड रोखणे, अवैध तोड झालेल्या मालाची बेकायदेशीर वाहतूक, वन्यजीवांची अवैध शिकार व व्यापार यावर नियंत्रण ठेवणे, वनसंपत्तीचे जतन करणे, वनातील घडणाऱ्या अवैध बाबीवर तसेच आगीच्या मौसमात लागणाऱ्या वणव्यावर नियंत्रण ठेवणे, अवैध चराई, अतिक्रमणावर नियंत्रण ठेवणे यासर्व बाबींचा विचार करुन वनसंरक्षण कुटीचे बांधकाम, कुटीजवळ बोरवेलेचे काम इत्यादी प्रस्तावित कामास आवश्यक असलेला नियतव्यय वार्षिक योजना सन २०१४-१५ मध्ये राज्य योजनाअंतर्गत १६-वनस्थानकांचे बांधकामाकरिता रु.१२३.५२ लक्ष निधी सुधारित अंदाजपत्रकानुसार अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

## शासन निर्णय :-

राज्य योजना "१६ वनस्थानकांचे बांधकाम" (२४०६ २१८८) या योजनेचा रु.१२३.७२ लक्ष एवढया रकमेचा सन २०१४-१५ चा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. याकरीता सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी रु.१२३.५२ लक्ष नियतव्यय सुधारित अंदाजपत्रकानुसार अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ येथील दिनांक २.१.२०१५ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पीत रक्कम रु.१२३.७२ लक्ष रकमेच्या ७५% मर्यादेत म्हणजेच रु.९२.७९ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला होता. तथापि, याकरीता सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी सुधारित अंदाजपत्रकानुसार अर्थसंकल्पीत नियतव्यय रु.१२३.५२ लक्ष इतका आहे. या सुधारीत अर्थसंकल्पीय निधीमधून यापूर्वी वितरीत करण्यात आलेला रु.९२.७९ लक्ष वजा करता उर्वरीत रक्कम रु.३०.७३ लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेवर होणारा खर्च-सी-७, प्रधानशीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१ वनीकरण १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (३१) वनस्थानकाचे बांधकाम, राज्य योजनाअंतर्गत योजना (२४०६ २१८८) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२२/१५/व्यय-१०, दिनांक २३.३.२०१५ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११२४५११४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: CN = Uvais Mohammed Farooqui, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2015.03.31 12:55:33 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक),
५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी- अमरावती, गडचिरोली, नागपूर, चंद्रपूर, औरंगाबाद, पुणे, कोल्हापूर, नाशिक, ठाणे, यवतमाळ.
८) कार्यासन अधिकारी, ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना विनंती करण्यात येते की ,नमूद शासन निर्णयानुसार रक्कम वितरित करण्यात यावी.
९) कार्यासन अधिकारी फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) फ-६, कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.